एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम कक्ष अधिकारी गट ब संवर्गातील परिविक्षाधीन उमेदवारांच्या परिविक्षा कालावधीतील वेतनाबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कअनि १११४/प्र.क्र.३३/१४ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २१ ऑगस्ट, २०१४

**संदर्भ :**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन २०१४/प्र.क्र.९९/१४/१२-अ, दिनांक ०९.०५.२०१४
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. कअनि १११४/प्र.क्र.३३/१४ब, दिनांक ०५.०६.२०१४
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०५१४/प्र.क्र.१८/१८-ब, दिनांक ०८.०८.२०१४

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक २०.०१.२०१४ अन्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणा-या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येणार आहे. संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सरळसेवेने नियुक्त होणा-या गट अ व गट ब मधील अधिका-यांच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत.

२. त्याअनुषंगाने राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१३ च्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या कक्ष अधिकारी - गट ब या संवर्गातील उमेदवारांकरिता संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये रू.९३००-३४८००, ग्रेड वेतन रू. ४८००/- या वेतनश्रेणीत ४ अधिसंख्य पदे दिनांक ०९.०६.२०१४ पासून दोन वर्षांच्या कालावधीकरिता निर्माण करण्यात आली आहेत. सदर परिविक्षाधीन कक्ष अधिका-यांना प्रशिक्षण कालावधीत द्यावयाच्या रू.२०,०००/- या मासिक ठोक रकमेसाठी दोन वर्षांचा परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संपुष्टात येईपर्यंत त्रैमासिकरित्या अग्रिम निधी वनामती, नागपूर या संस्थेला उपलब्ध करून देण्यात यावा असे आदेशित केले आहे.

३. तथापि, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक ०८.०८.२०१४ अन्वये संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयामध्ये बदल केले असून "परिविक्षाधीन उमेदवारांचे टप्पा १चे ८ आठवड्यांचे "पायाभूत प्रशिक्षण" आणि त्यानंतर ६ आठवडयांची "अनिवार्य संलग्नता" असे १४ आठवड्यांचे प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर हे परिविक्षाधीन अधिकारी टप्पा ३ च्या, "व्यावसायिक खातेनिहाय/ तांत्रिक प्रशिक्षणा" साठी संबंधित विभागाकडे जेव्हा रूजू होतील तेव्हापासून त्यांना विभागामार्फत नियमित वेतन अदा करण्यात यावे. एखाद्या विभागाकडे टप्पा ३ च्या प्रशिक्षणासाठी पर्याप्त सुविधा नसेल अशा विभागाच्या नियंत्रणाखालील अधिका-यांचे प्रशिक्षण जरी प्रशिक्षण संस्थेमार्फत घेण्यात येणार असले तरी, ज्या दिनांकास हे प्रशिक्षण, प्रशिक्षण संस्थेमार्फत सुरू करण्यात येईल त्या दिनांकापासून उमेदवारांना नियमित वेतन संबंधित विभागाकडून अदा करण्यात येईल. तसेच आधीच्या कालावधीत अदा कलेले ठोक वेतन आणि नियमित वेतन यातील फरकाची रक्कम देखील एक रकमी तात्काळ अदा करण्यात येईल" असे निदेश दिले आहेत.

४. याअनुषंगाने संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन निर्णयामध्ये आता अंशत: बदल करण्यात येत असून सदर शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. ४ मधील तक्त्यातील अ.क्र. ३ ते ९ मधील ठोक वेतनासाठी प्रत्येकी रू.२०,००० प्रमाणे केलेली तरतूद याद्वारे रद्द करण्यात येत आहे. कक्ष अधिकारी गट ब संवर्गातील परिविक्षाधीन अधिकारी टप्पा ३ च्या "व्यावसायिक खातेनिहाय/तांत्रिक प्रशिक्षणा" साठी सामान्य प्रशासन विभागाकडे ज्या दिनांकापासून रूजू होतील त्या दिनांकापासून त्यांना रू.९३००-३४८००, ग्रेड वेतन रू. ४८००/- या वेतनश्रेणीत नियमित वेतन अदा करण्यात यावे तसेच उपरोक्त तक्त्यातील अ.क्र.१ ते २ मध्ये नमूद केलेल्या कालावधीत अदा केलेले ठोक वेतन आणि नियमित वेतन यातील फरकाची रक्कम देखील एक रकमी तात्काळ अदा करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२११६०३३८८६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADIK SUCHITA M

Digitally signed by MAHADIK SUCHITA M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=MAHADIK SUCHITA M
Date: 2014.08.21 16:02:20 +05'30'

**(सु.मो.महाडिक)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.

२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
७. महासंचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. अवर सचिव, (का. क्र.१२-अ, १८-ब, २५ ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव, का. क्र.२६ , सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई (आवश्यक कार्यवाहीकरिता)
११.जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर.
१२.वित्त विभाग ( व्यय - ४ व वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवडनस्ती.